**दस्त मुद्रांकित करण्याच्या यंत्राने मुद्रांकित केलेल्या प्रती दस्ताच्या रकमेत वाढ करणेबाबत तसेच फ्रॅकिंगसाठी सध्या अस्तित्वात असलेली मर्यादा रु.५०००/- वरुन रु.१०,०००/- करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मुद्रांक-२०२४/१३२२/प्र.क्र.२०१/म-१ (धोरण)**
दालन क्र.एम-७ ए, पोटमाळा, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक: ०७ एप्रिल,२०२५

<u>संदर्भ:-</u> १) महसूल व वन विभाग,शासन निर्णय क्र. मुद्रांक २००३/१३५८/प्र.क्र.३५६/म-१, दिनांक २६.३.२००४
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. मुद्रांक -२००८/प्र.क्र.२४७/म-१, दिनांक ७ ऑगस्ट,२००८
३) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. का.५/मुद्रांक-फ्रॅक्रिग/ सं.क्र.१९६०/२४/६९२/२०२४ दिनांक ९/५/२०२४.

**प्रस्तावना-**

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र मुद्रांक अधिनियमातील तरतुदीनुसार संलेखावर फ्रॅक्रिंगव्दारे मुद्रांक शुल्क भरण्यासाठी राष्ट्रीकृत बँका,शेडयुल बँका,सहकार आयुक्त यांनी “अ” वर्गवारी केलेल्या सहकारी बँका, पोस्ट ऑफीसेस व तत्सम वित्तीय संस्था ज्यांच्यावर शासन/रिझर्व्ह बँक यांचे नियंत्रण आहे, अशा संस्थांना दस्त मुद्रांकित करण्याचे अधिकार देण्यात आले असून दस्त मुद्रांकित करण्याच्या यंत्राने मुद्रांकित केलेल्या प्रती दस्तासाठी रुपये १०/-अशा पध्दतीने सेवाशुल्क जनतेकडून घेण्यास परवानगी देण्यात आलेली आहे.

अपर मुद्रांक नियंत्रक, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या समितीने दि.२८/६/२०२४ रोजी केलेल्या शिफारशीनुसार फ्रॅक्रिंगसाठी सध्या अस्तित्वात असलेली मर्यादा रु.५००० वरुन रु.१०,०००/- पर्यंत करणे तसेच सेवा शुल्क रु.१० वरुन रु.१५/- पर्यत करणे,व पोलिस चारित्र्याची अट कायम ठेवणे या शिफारशी योग्य असल्याबाबत नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महा.पुणे यांनी संदर्भ क्र.३ येथील प्रस्तावान्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे. अपर मुद्रांक नियंत्रक,मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीने केलेल्या शिफारशीचे अवलोकन केले असता सदर शिफारशी स्वीकारल्यास राज्याच्या महसूलात वाढ होईल तसेच नागरिकांना देखील मुद्रांकाबाबत सुविधा उपलब्ध होणार असल्याने सदर शिफारशी स्वीकारण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

अपर मुद्रांक नियंत्रक,मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीने सुचविलेल्या शिफारशीनुसार शासन निर्णय क्र.मुद्रांक -२००४/१३५८/प्र.क्र.३५६/म-१,दि.२६.३.२००४ अन्वये सर्व बँका/तत्सम वित्तीय संस्था यांना जनतेकडून दस्त मुद्रांकित करण्याच्या यंत्राने मुद्रांकित केलेल्या प्रती दस्तासाठी रुपये १०/ वरुन रु.१५/- इतकी वाढ करण्यास तसेच फ्रॅकिंगसाठी सध्या अस्तित्वात असलेली मर्यादा रु.५०००/- वरुन रु.१०,०००/- पर्यंत करणे व पोलिस चारित्र पडताळणी प्रमाणपत्राची अट कायम ठेवण्याबाबत या आदेशाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

**२.** हा शासन निर्णय वित्त विभाग/साधनसंपत्ती, अनौपचारिक संदर्भ क्र. ९७/साधानसंपत्ती, दिनांक १०/२/२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४०७१७०५१४३६१९ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=559498df564ab1121a356349085c1b8e3cc0f12569ba0f7f2090386d4dccb333, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2025.04.07 17:07:40 +05'30'

**(सत्यनारायण बजाज)**
**सह सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई .
३. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव,मंत्रालय,मुंबई.
४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
५. सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
६. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
७. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
८. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
९. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१०. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य,पुणे.
११. सर्व नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महाराष्ट्र राज्य,पुणे
१२. सर्व सह जिल्हा निबंधक वर्ग-१,नोंदणी महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,पुणे
१३. महालेखापाल-१ व २ (मुंबई/नागपूर) महाराष्ट्र राज्य.
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे,मुंबई
१५. अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, पुणे/कोल्हापूर.
१६. उप संचालक (लेखा), नोंदणी महानिरीक्षक कार्यालय, पुणे.
१७. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (साधनसंपत्ती), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८. निवडनस्ती, कार्यासन म-१(धोरण), महसूल व विभाग, मंत्रालय, मुंबई.